**सुधारित प्रशासकीय मान्यता**
**मिरा-भाईंदर, जिल्हा ठाणे येथे न्यायाधीश निवासस्थाने बांधण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीआरक्यू-१२१७/प्र.क्र.१५५/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १ फेब्रुवारी, २०२२.

पहा :-

१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र.सीआरक्यू-२०१२/प्र.क्र.१५६/का-१३, दिनांक २१ जून, २०१३.
२) उप प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू)६००२/२००५/२४०९/२९६३३, दिनांक १५ सप्टेंबर, २०१७ चे पत्र.
३) उप प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू)६००२/२००५(१०)/८४९, दिनांक १८ सप्टेंबर, २०२० चे पत्र.

**प्रस्तावना :-**

मिरा-भाईंदर, जिल्हा ठाणे येथील न्यायाधीश निवासस्थानांच्या बांधण्याकरीता उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये रु.१,४२,७३,१३७/- इतक्या किमतीस प्रशासकिय मान्यता देण्यात आलेली आहे. परंतु बांधकामाच्या खर्चात वाढ झाल्याने मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्र क्र. २ व ३ अन्वये सदर बांधकामास सुधारित प्रशासकिय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदरहू प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय :-**

मिरा-भाईंदर, जिल्हा ठाणे येथील न्यायाधीश निवासस्थानांच्या बांधण्यासाठी रु.४५१.८३ लक्ष (रुपये चार कोटी एक्कावन्न लक्ष त्र्याऐंशी हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ . क्र. | बाब | सुधारित प्रशासकीय मान्यता (रूपये लाखात) |
|---|---|---|
| १. | बांधकाम खर्च | २५२.७५ |
| २. | विद्युतीकरण | ३६.३० |
| ३. | आकस्मिक खर्च | १०.९१ |
| ४. | रेनवॉटर हार्वेस्टिंग | १.०० |
| ५. | पाईप गॅस | ०.५० |
| ६. | फर्निचर | २३.०४ |

| | | |
|---|---|---|
| ७. | रंगकाम | १.०० |
| ८. | डी.जी.सेट | १०.६७ |
| ९. | वातानुकूल यंत्रणा | २२.०० |
| १०. | सोलार पी.व्ही.यंत्रणा | १२.८५ |
| ११ | सी.सी.टी.व्ही. | ५.०० |
| १२. | सोलार हॉट वॉटर यंत्रणा | ४.१९ |
| १३. | एमएसडीएल चार्जेस | ३.२९ |
| १४. | कलम ३८ चार्जेस | १२.३८ |
| १५. | वस्तू व सेवा कर | ३०.५२ |
| १६. | भाववाढ | २५.४३ |
| १७. | **एकूण** | **४५१.८३** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र .इएनव्ही-२०१३ / प्र.क्र.१७७ /तां.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) काम सुरु करण्यापूर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

इ) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय, क्र.बीडीजी २०१७/ प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

फ) फर्निचरच्या बाबी तसेच मांडणीबाबत उपभोक्ता विभागाच्या वतीने प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश यांची मान्यता घेतल्यानंतरच निविदा कार्यवाही करावी.

ग) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलितय शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे, राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निदेशांचे व त्रुटींची पुर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी विभागाची राहील.

ह) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदा विषयक क्षेत्रीय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळेच्या प्रचलित नियमानुसार करण्याची जबाबदारी विभागाची राहील.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. एच-७, ४२१६, गृहनिर्माणावरील भांडवली खर्च, ७०० इतर गृहनिर्माण, (०१) न्यायदान- केंद्रपुरस्कृत योजना, राज्यहिस्सा (०१) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६ ०२९१) व केंद्र हिस्सा (०३) (०४) मोठी बांधकामे-५३ (कार्यक्रम)

(४२१६०५२२)" या लेखाशिर्षाखाली मंजूर नियतव्ययातून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात खर्ची टाकण्यात येणार आहे. मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.७०/२०२०/इमा-२, दिनांक ७ ऑक्टोबर, २०२०, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१०४/१४४३, दिनांक १७ डिसेंबर, २०२० तसेच, नियोजन विभाग, परिपत्रक, क्र.ससमा-२०१०/ प्र.क्र.४८/ भाग-१/ का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ मध्ये नमूद केल्यानुसार विभागास असलेल्या अधिकारानुसार तसेच, व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक १६ डिसेंबर, २०२१ रोजी झालेल्या बैठकित समितीने दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०२०११६५४११५५१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E,
serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.02.01 16:55:23 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**
**विधि सल्लागार नि सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. सभापती ,विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता ,विधान परिषद/ विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
५) मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
६) मा.प्रबंधक बी (डब्ल्यू) शाखा, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई ,
७) मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, ठाणे.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक/दोन ,मुंबई व नागपूर,

९) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे.

१०) कार्यकारी अभियंता (सार्वजनिक बांधकाम विभाग), मीरा-भाईंदर, ठाणे. (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)

११) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.

१२) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१३) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१४) नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१५) अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.

१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१७) कक्ष अधिकारी, का. ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१८) निवड नस्ती/संग्रहार्थ.